सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत वितरीत करण्यात येणाऱ्या केरोसिन परिमाणाच्या पुनर्निधारणासाठी मंत्रिमंडळ उपसमिती गठीत करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**

**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः रॉकेल - २०१५/प्र.क्र.१७१/ना.पु.२७**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

तारीख: २४ एप्रिल, २०१५

वाचा -

1) **शासन पत्र क्रमांकः केईआर - १०९७ /जुन-९७/प्र.क्र.५३४०/ना.पु.२७, दि. ११ जुलै, १९९७.**
2) **शासन पत्र क्रमांकः रॉकेल - १०९७ /२७०६/प्र.क्र.५४०९/ना.पु.२७, दि. २८ जुलै, १९९७**
3) **शासन पत्र क्रमांकः रॉकेल - १०९७ /२७०६/प्र.क्र.५४०९/ना.पु.२७, दि. २७ जुलै, १९९८**

प्रस्तावना :-

सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत केंद्र शासनाकडून राज्यातील पात्र शिधापत्रिकाधारकांना वितरित करण्यासाठी उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या केरोसिनचे परिमाण संदर्भाधीन क्र.१ ते ३ येथील शासन पत्रान्वये निर्धारित करण्यात आले आहे.

२. केंद्र शासनाने राज्याच्या केरोसिन नियतनामध्ये वेळोवेळी कपात केली आहे. सद्य:स्थितीत राज्याच्या एकूण आवश्यक नियतनाच्या २९% इतके नियतन राज्यास प्राप्त होते व त्या प्रमाणातच राज्यातील लाभार्थ्यांना केरोसिन उपलब्ध करण्यात येते.

३. निश्चित केलेल्या केरोसिन परिमाणानुसार केरोसिन मिळत नसल्यामुळे, वाशिम जिल्ह्यातील श्री.कडुजी देवबा पुंड यांनी मा.उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठासमोर जनहित याचिका क्र.१६/२०१४ दाखल केली आहे. या याचिकेमध्ये वेळोवेळी झालेल्या सुनावणीमध्ये मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या आदेशानुसार केरोसिन परिमाण निर्धारित करण्याबाबतचा प्रस्ताव मंत्रिमंडळासमोर विचारार्थ ठेवण्यासाठी शासनास सादर केला असता, शासनाने सदर प्रकरणी मंत्रीमंडळ उपसमितीचे गठन करुन त्यानंतर निर्णय घ्यावा, असे आदेश दिले.

**शासन निर्णय -**

त्यानुसार सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत वितरित करण्यात येणाऱ्या केरोसिन परिमाणाचे पुनर्निधारणाबाबत शिफारस करण्यासाठी खालीलप्रमाणे मंत्रिमंडळ उपसमिती गठीत करण्यात येत आहे :-

१. मा.श्री.गिरीश बापट, मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण अन्न औषध प्रशासन, संसदीय कार्य - अध्यक्ष

२. मा.श्री.चंद्रकांत पाटील, मंत्री, सहकार, पणन आणि वस्त्रोद्योग सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) - सदस्य

३. मा.डॉ.दीपक सावंत, मंत्री, सार्वजनिक आरोग्य आणि कुटुंब कल्याण - सदस्य

४. सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग - सदस्य सचिव

सदर समितीने आपला अहवाल तातडीने सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४२७१२११५८४८०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kishor Govind Thosar

Digitally signed by Kishor Govind Thosar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kishor Govind Thosar
Date: 2015.04.27 12:24:23 +05'30'

(कि.गो.ठोसर)
अवर सचिव,
अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव
२. मा.श्री.गिरीश बापट, मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण,अन्न औषध प्रशासन, संसदीय कार्य यांचे खाजगी सचिव
३. मा.श्री.चंद्रकांत पाटील, मंत्री, सहकार, पणन आणि वस्त्रोद्योग, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव
४. मा.डॉ.दीपक सावंत, मंत्री, सार्वजनिक आरोग्य आणि कुटुंब कल्याण यांचे खाजगी सचिव
५. सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय,मुंबई यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
६. निवड नस्ती (ना.पु.२७) कार्यासन.